नागरी प्रकल्पांच्या पुनर्रचनेनंतर गट-अ व गट-ब संवर्गातील अधिकाऱ्यांचे समायोजन करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**

**महिला व बाल विकास विभाग**

**शासन आदेश क्रमांक:- मबाआ-२०२०/प्र.क्र.३६/का.७**

नवीन प्रशासकीय इमारत,मंत्रालय,मुंबई.

दिनांक:- २३ जून, २०२३.

**संदर्भ:-**१) शासन निर्णय क्र. मबाआ-२०१५/प्र.क्र.२२/का-७अ, दि.५.५.२०१५.

२) शासन निर्णय क्र. मबाआ-२०१५/प्र.क्र.२२/का-७अ, दि.१५.६.२०१५.

३)शासन निर्णय क्र. मबाआ-२०२०/ प्र.क्र.३६/का.७,दि.४.३.२०२२.

४) शासन निर्णय क्र.मबाआ-२०२०/प्र.क्र.३६/का.७, दि.१४.१२.२०२२.

५) शासन आदेश क्र.मबाआ-२०२०/प्र.क्र.३६/का.७, दि.११.१.२०२३

६) आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना,नवी मुंबई यांचे पत्र क्र.एबाविसेयो/ आस्था/का- १/नागरी प्रकल्प पुनर्रचना/२०२२-२३/१४०२, दि.२९.३.२०२३

७) आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, नवी मुंबई यांचे पत्र क्र.एबाविसेयो/ आस्था/का-१/नागरीप्रकल्पपुनर्रचना/२०२२-२३/१४०३, दि.२९.३.२०२३.

**शासन आदेश:-**

एकात्मिक बाल विकास सेवा योजनेतंर्गत ग्रामीण प्रकल्पातील जी अंगणवाडी केंद्र नागरी स्थानिक स्वराज संस्थांच्या कार्यक्षेत्रात आहेत, त्यांचे नागरी प्रकल्पात समायोजन करणे तसेच नागरी प्रकल्पांची पुर्नरचना करण्याबाबत संदर्भाधिन क्र.३ च्या निर्णयान्वये शासन मान्यता देण्यात आली होती. सदर शासन निर्णयातील विवरणपत्र १ नुसार १७ नागरी प्रकल्प पूर्णत: बंद करण्यात येवून नव्याने १७ प्रकल्प निर्माण करण्यात आलेले आहेत. तसेच विवरणपत्र ३ नुसार ५ ग्रामीण प्रकल्प बंद करण्यात येवून नव्याने ५ प्रकल्प निर्माण करण्यात आलेले आहेत. त्यामुळे पूर्णत: बंद झालेल्या प्रकल्पांतील गट-अ व गट-ब संवर्गातील अधिकाऱ्यांचे अन्य प्रकल्पांमध्ये समायोजन करणे आवश्यक आहे. त्याअनुषंगाने आयुक्त,एकात्मिक बाल विकास सेवा योजना,नवी मुंबई यांच्यामार्फत विकल्प मागविण्यात आले होते. अधिकाऱ्यांकडून प्राप्त विकल्प व त्याअनुषंगाने समायोजनाबाबतचा प्रस्ताव संदर्भ क्र.६ व ७ येथील पत्रान्वये आयुक्त,एकात्मिक बाल विकास सेवा योजना, नवी मुंबई यांच्याकडून प्राप्त झाला आहे. आयुक्त,एकात्मिक बाल विकास सेवा योजना,नवी मुंबई यांच्याकडून प्राप्त समायोजनाचा प्रस्ताव व सदर अधिकाऱ्यांचे विकल्प विचारात घेऊन पदस्थापनेच्या प्रस्तावास मा.प्रधान सचिव यांच्या अध्यक्षतेखालील नागरी सेवा मंडळाची विहित पध्दतीने मान्यता घेण्यात आली आहे. नागरी सेवा मंडळाने केलेल्या शिफारशीनुसार द्यावयाच्या पदस्थापनेच्या प्रस्तावास सक्षम प्राधिकाऱ्याची मान्यता घेण्यात आली आहे. त्यानुषंगाने पूर्णत: बंद झालेल्या प्रकल्पांतील गट-अ व गट-ब संवर्गातील अधिकाऱ्यांची पुढील तक्यातील स्तंभ ३ मध्ये नमूद प्रकल्पातील पदावर समायोजनाने पदस्थापना करण्यात येत आहे:-

| अ.क्र. | अधिकाऱ्यांचे नाव व पूर्वी कार्यरत तसेच पुनर्रचनेमुळे बंद झालेल्या प्रकल्पाचे नाव | समायोजनाने करण्यात आलेली पदस्थापना |
|---|---|---|
| १ | २ | ३ |
| | **गट-अ** | |
| १ | श्री.चं. भ. चेके, बाल विकास प्रकल्प अधिकारी (ना),अकोला -२ | बाल विकास प्रकल्प अधिकारी (ना), अकोला शहर |

| अ.क्र. | अधिकाऱ्यांचे नाव व पूर्वी कार्यरत तसेच पुनर्रचनेमुळे बंद झालेल्या प्रकल्पाचे नाव | समायोजनाने करण्यात आलेली पदस्थापना |
|---|---|---|
| १ | २ | ३ |
| २ | श्री. एन. बी. कराळे, बाल विकास प्रकल्प अधिकारी (ना),लालबत्ती, | बाल विकास प्रकल्प अधिकारी (ना), अहमदनगर (पश्चिम) |
| ३ | श्री.आर.आर. तडवी, बाल विकास प्रकल्प अधिकारी (ना), भांडूप -प. | बाल विकास प्रकल्प अधिकारी (ना), जळगाव (दक्षिण) |
| ४ | श्री. साधू चांदणे, बाल विकास प्रकल्प अधिकारी (ना),वरळी-कांदीवली | बाल विकास प्रकल्प अधिकारी (ना), गोरेगाव -पुर्व, मुंबई. |
| ५ | श्री.एस.एम.खंडागळे, बाल विकास प्रकल्प अधिकारी (ना), घाटकोपर-२, | बाल विकास प्रकल्प अधिकारी (ना), गोरेगाव -पश्चिम, मुंबई. |
| ६ | श्रीम.एस.के.शेलार, बाल विकास प्रकल्प अधिकारी (ना),मालवणी | बाल विकास प्रकल्प अधिकारी (ना.), जि. रायगड |
| ७ | श्रीमती.टी.आर.ढेरे, बाल विकास प्रकल्प अधिकारी (ना) ,मूलूंड-पुर्व | बाल विकास प्रकल्प अधिकारी (ना), पिंपरी-चिंचवड - पश्चिम, पुणे |
| ८ | श्री.अे.आर.चौधरी, बाल विकास प्रकल्प अधिकारी (ना), तुंगामोहली, | बाल विकास प्रकल्प अधिकारी (ना), अंधेरी -पश्चिम |
| ९ | श्रीम.यु.ए.जाधव, बाल विकास प्रकल्प अधिकारी (ना), घोरपडी कोंढवा, | बाल विकास प्रकल्प अधिकारी (ना), कुर्ला, मुंबई |
| १० | श्रीम.एस.ए.ओव्हाळ, बाल विकास प्रकल्प अधिकारी (ना), पुणे-१, | बाल विकास प्रकल्प अधिकारी (ना),पनवेल |
| ११ | श्री. संजय शिंदे, बाल विकास प्रकल्प अधिकारी (ना),अंबरनाथ | बाल विकास प्रकल्प अधिकारी (ना), घाटकोपर |

**गट-ब**

| अ.क्र. | अधिकाऱ्यांचे नाव व पूर्वी कार्यरत तसेच पुनर्रचनेमुळे बंद झालेल्या प्रकल्पाचे नाव | समायोजनाने करण्यात आलेली पदस्थापना |
|---|---|---|
| १ | २ | ३ |
| १ | श्रीम.धनश्री साळुंखे, बाल विकास प्रकल्प अधिकारी (ग्रा),ठाणे | बाल विकास प्रकल्प अधिकारी (ग्रा.), शहापूर |

२. सदर आदेश तात्काळ अंमलात येतील. तसेच संबंधित अधिकाऱ्यांनी त्यांच्या समायोजनाने पदस्थापना झालेल्या पदावर तात्काळ रुजू व्हावे व त्याबाबतचा रूजू अहवाल विहित मार्गाने शासनास सादर करावा.

३. वरीलप्रमाणे समायोजनाने पदस्थापना करण्यात आलेल्या अधिकाऱ्यांना पूर्व परवानगीशिवाय कोणत्याही प्रकारची रजा मंजूर करु नये वा महाराष्ट्र नागरी सेवा (रजा) नियम १९८१ मधील नियम ३० (सी) नुसार मूळ कार्यालयाने पदस्थापना झालेल्या अधिकाऱ्यांचे कोणत्याही प्रकारचे रजेचे अर्ज स्वीकारु नयेत.

४. वरीलप्रमाणे समायोजनाने पदस्थापना करण्यात येत असलेल्या अधिकाऱ्यांना पदस्थापनेने देण्यात आलेल्या पदावर रुजू करुन घेताना, ते रजेवर / गैरहजर होते किंवा कसे याबाबतची खातरजमा त्यांना पदस्थापनेवर हजर करुन घेणाऱ्या कार्यालयाने करावी. सदर अधिकारी वैद्यकीय कारणास्तव गैरहजर असतील तर त्यांना हजर करुन घेण्यापूर्वी वैद्यकीय मंडळासमोर पाठवावे. जर अन्य रजेवर होते असे

आढळल्यास त्यांचेकडून न चुकता तसा रजेचा अर्ज भरुन घ्यावा आणि नंतर हजर करुन घ्यावे. तसेच रजा संदर्भात शासनाने वेळोवेळी निर्गमित केलेल्या शासन निर्णय / परिपत्रकांतील निदेशांचे पालन करावे.

५. उपरोक्त अधिकाऱ्यांना पदग्रहण अवधी,प्रवासभत्ता,दैनिक भत्ता व तद्नुषगीक लाभ अनुज्ञेय राहतील.

६. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०६२३१८३०३०४३३० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

RAJENDRA T BHALWANE

Digitally signed by RAJENDRA T BHALWANE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WOMEN AND CHILD DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=38d121bf4a170d16dacf98520f0ac4455197693 1d2758148ccaa24d1fb27b9df, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=BADFC0DAA40CC485400AAD9CEABCD 514095659A6CDFAC856815518DCD188C23A, cn=RAJENDRA T BHALWANE
Date: 2023.06.26 14:12:58 +05'30'

**(रा.ता.भालवणे)**
**शासनाचे अवर सचिव**

**प्रति,**

१. मा.मंत्री (म.व बा.वि.वि), यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
२. मा. सचिव (म.व बा.वि),यांचे वरिष्ठ स्वीय सहाय्यक, मुंबई-४०० ०३२.
३. आयुक्त, महिला व बाल विकास आयुक्तालय, पुणे.
४. आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, कोकण भवन, नवी मुंबई.
५. सर्व विभागीय उप आयुक्त, महिला व बाल विकास, विभाग (आयुक्तालयामार्फत)
६. संबंधित अधिकारी (आयुक्तालयामार्फत)
७. महालेखापाल १/२ (लेखा व अनुज्ञेयता) / (लेखापरिक्षा), मुंबई/नागपूर (आयुक्तालयामार्फत)
८. संबंधित जिल्हा कोषागार अधिकारी (आयुक्तालयामार्फत)
९. निवड नस्ती का-७.